महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट-ब (प्रशासन शाखा) या पदावरून जिल्हा तांत्रिक सेवा गट-क (शिक्षण) या पदावर पदावनत करण्याबाबत-

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन आदेश क्रमांक : निसूची-३६१८/प्र.क्र.२५/प्रशा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक: १३ डिसेंबर, २०१९

<u>वाचा :</u>- १. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन आदेश क्रमांक : निसूची-३६१८/प्र.क्र.२५/प्रशा-२, दिनांक १६ सप्टेंबर, २०१९

२. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्रमांक : आस्था-अ/टे.१०६/जितासे-निसबै/बंधपत्र/२०१९/६५१७, दिनांक २० नोव्हेंबर, २०१९

<u>प्रस्तावना -</u>

जिल्हा तांत्रिक सेवा, गट-क (शिक्षण) या संवर्गातील कर्मचाऱ्यांना उपशिक्षणाधिकारी व तत्सम, महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट-ब (प्रशासन शाखा) या पदावर निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात पदोन्नती देण्यासाठी आयुक्त (शिक्षण) यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक १७.०४.२०१८ रोजी विभागीय पदोन्नती निवड समितीची बैठक आयोजित करण्यात आली होती. सदर बैठकीमध्ये सेवाज्येष्ठतेनुसार २७ कर्मचाऱ्यांच्या नावाचा विचार होऊन त्यांना पदोन्नतीसाठी पात्र ठरविण्यात आले. त्यानुसार सदर कर्मचाऱ्यांचे पदोन्नतीचे आदेश दिनांक १६ सप्टेंबर, २०१९ रोजी निर्गमित करण्यात आले आहेत.

२. महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट-ब (प्रशासन शाखा) मध्ये निवडीद्वारे पदोन्नती देण्यासाठी तयार केलेली दिनांक ३१.१२.१९९४ अखेरची एकत्रित संयुक्त अंतिम ज्येष्ठतासूची आयुक्त (शिक्षण) यांच्या कार्यालयामार्फत दिनांक २२.१२.२०१४ रोजी प्रसिध्द करण्यात आली होती. सदर ज्येष्ठता यादीतील जिल्हा परिषद उस्मानाबाद येथील कार्यरत कर्मचारी श्री. खुर्शिद अहमद अजिज बरोटे (ज्ये.क्र.४०३०) यांच्या नावाच्या समावेशाबाबत श्री. भाऊसाहेब मुरलीधर जाधव (ज्ये.क्र.४२७२) व श्री. युवराज गणपतराव शिंदे (ज्ये.क्र.४५४६) यांनी आक्षेप नोंदविला होता.

३. श्री. भाऊसाहेब मुरलीधर जाधव व श्री. युवराज गणपतराव शिंदे यांनी घेतलेल्या आक्षेपांची शहानिशा केली असता श्री. बारोटे यांची जिल्हा परिषद उस्मानाबाद येथील प्रथम नियुक्ती दिनांक २३.०९.१९९३ ची असून, त्यानुसार त्यांचे नाव राज्यस्तरीय सेवाज्येष्ठता मधील से.ज्ये.क्र.४०३० वरून राज्यस्तरीय सेवाज्येष्ठता सूचीमध्ये ४८५८-अ वर श्री.संजय किसन सरवदे (से.ज्ये.क्र.४८५८)

यांच्या नावानंतर व श्री. संजीव पुंजू पवार (से.ज्ये.क्र.४८५९) याच्या नावापूर्वी वर्ग करण्यात आले आहे. सबब, श्री. खुर्शिद अहमद अजिज बरोटे हे सेवाज्येष्ठतेनुसार पदोन्नतीस पात्र नसल्याने त्यांना जिल्हा तांत्रिक सेवा, गट-क (शिक्षण) या पदावर पदावनत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

दिनांक १६ सप्टेंबर, २०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये उपशिक्षणाधिकारी व तत्सम, महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट-ब (प्रशासन शाखा) या पदावर श्री. खुर्शिद अहमद अजिज बरोटे यांचे पदोन्नतीचे आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. श्री. खुर्शिद अहमद अजिज बरोटे यांची उपशिक्षणाधिकारी व तत्सम, महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट-ब (प्रशासन शाखा) या पदावरील पदोन्नती या शासन निर्णयान्वये रद्द करण्यात येत आहे.

२. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१९१२१३१२२८२२५१२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहेत .

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DEEPAK VIJAY SHELAR

Digitally signed by DEEPAK VIJAY SHELAR
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=6cd30ed620a4fe01f24cb84cc86e70f3b8f6f1fdcdb2469570c78dabb9acf4ba, postalCode=400032, street=ROOM NO 4.4,ANNEX BLDG,SCHOOL EDUCATION DEPT.MANTRALAYA,MUMBAI, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=DEEPAK VIJAY SHELAR
Date: 2019.12.13 12:29:47 +05'30'

**( दीपक शेलार )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद उस्मानाबाद,
३. विभागीय शिक्षण उपसंचालक, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
४. शिक्षणाधिकारी, उस्मानाबाद माध्यमिक / प्राथमिक / निरंतर
५. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा उस्मानाबाद
६. संबंधित अधिकारी (आयुक्त (शिक्षण) यांचे कार्यालयामार्फत)

**प्रत माहितीसाठी अग्रेषित,**

१. मा. मंत्री (शा.शि.व क्री.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. अपर मुख्य सचिव सचिव (शा.शि. व क्री. विभाग) यांचे स्वीय सहायक
३. निवडनस्ती